**श्री.राजेंद्र पांडुरंग धुम, सहायक अभियंता श्रेणी-१ यांच्या सेवा जलसंपदा विभागाकडे प्रत्यार्पित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश क्रमांक :न्यायाप्र-२०२३/प्र.क्र.२३८/जल-२**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ३० जुलै, २०२४

**संदर्भ -** १. मृद व जलसंधारण विभागाचे क्रमांक आस्थाप-२०२२/प्र.क्र.११५/जल-२ दि.१७/०४/२०२३ रोजीचे आदेश
२. मृद व जलसंधारण विभागाचे समक्रमांकाचे शासन आदेश, दि.०३/०७/२०२३
३. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र.७८४/२०२३ मधील दि.१५/०२/२०२४ चे आदेश

**शासन आदेश -**

श्री.राजेंद्र पांडुरंग धुम, उपविभागीय जलसंधारण अधिकारी, (सहायक अभियंता श्रेणी-१) मृद व जलसंधारण उपविभाग, सुरगाणा, जि.नाशिक यांच्या सेवा जलसंपदा विभागास प्रत्यार्पित करून त्या ठिकाणी श्री.राजीव तुकाराम शिंदे यांना पदोन्नतीने पदस्थापना उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या आदेशान्वये देण्यात आली होती. त्यानंतर संदर्भ क्र.१ च्या आदेशात अंशत: बदल करून, श्री.राजेंद्र पांडुरग धुम यांना उपविभागीय जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण उपविभाग, सुरगाणा, जि.नाशिक या पदावर तात्पुरत्या स्वरूपात संदर्भ क्र.२ अन्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता, संदर्भ क्र.३ अन्वये मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मूळ अर्ज क्र.७८४/२०२३ मध्ये दिलेल्या न्यायनिर्णयानुसार, श्री.धुम यांच्या मुदतवाढीबाबतचे संदर्भ क्र.२ येथील दि.०३/०७/२०२३ चे आदेश सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने रद्द करण्यात येत आहेत.

३. या परिणामी, श्री.राजेंद्र पांडुरंग धुम, सहायक अभियंता श्रेणी-१ यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागाकडे, म्हणजेच जलसंपदा विभागाकडे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत. श्री. धुम यांनी त्यांच्या मूळ विभागात तत्काळ रुजू व्हावे.

४. सदरचे आदेश तत्काळ अंमलात येत आहेत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०७३०१०५१२६४१२६ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2024.07.30 11:07:54 +05'30'

**( यु .ब. अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.

३. मा. मंत्री, मृद व जलसंधारण महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
५. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, (मृद व जलसंधारण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छ.संभाजीनगर
९. अपर आयुक्त जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
१०. प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक.
११. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथक, छ.संभाजीनगर
१२. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, नाशिक
१३. जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग, नाशिक
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१५. श्री.राजेंद्र पांडुरंग धुम, सहायक अभियंता श्रेणी-१ (ई-मेलव्दारे)
१६. सर्व कार्यासने (मृद व जलसंधारण विभाग)
१७. निवड नस्ती